**महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास पाच दिवसांचा आठवडा लागू करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः मजीप्रा-११२०/प्र.क्र.६६/पापु-२३**

सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय इमारत संकुल, क्रॉफर्ड मार्केट जवळ,
लोकमान्य टिळक मार्ग, नवीन मंत्रालय इमारत, मुंबई ४०० ००१.
तारीख: २९ जून, २०२०

वाचा -

१) **शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः** समय-२०१६/प्र.क्र.६२/१८(रवका), दिनांक २४/०२/२०२०

२) **मुख्य प्रशासकीय अधिकारी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांचे पत्र क्रमांकः** मजीप्रा-२०२०/पाच दि. आठवडा/आ-३/१०८, दिनांक २७/०२/२०२०.

**प्रस्तावना :-**

शासन पत्र, नगर विकास विभाग, दिनांक २१/०१/१९८४ अन्वये महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील अधिकारी/ कर्मचाऱ्यांना महाराष्ट्र नागरी सेवा नियम लागू करण्यात आले आहेत. तसेच शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, दिनांक २३/०३/२०१७ नुसार महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील अधिकारी/कर्मचारी यांना महाराष्ट्र नागरी सेवा नियम व वेळोवेळी शासनामार्फत निर्गमित केले जाणारे शासन निर्णय लागू करण्यात आले आहेत.

केंद्र शासनाच्या धर्तीवर राज्य शासकीय कार्यालयांसाठी संदर्भाधीन दिनांक २४/०२/२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये पाच दिवसांचा आठवडा लागू करून सर्व शनिवार व रविवार हे सुट्टीचे दिवस ठरविण्यात आले आहेत.

महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने संदर्भाधीन क्र. २ येथील दिनांक २७/०२/२०२० रोजीच्या पत्रान्वये महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील पाणी पुरवठा केंद्रावरील नियमित आस्थापना, रूपांतरीत स्थायी/अस्थायी आस्थापना व रोजंदारी आस्थापनेवरील कर्मचारी वगळता प्राधिकरणातील अन्य कार्यालयांना पाच दिवसांचा आठवडा लागू करण्याची विनंती केली आहे.

## शासन परिपत्रक :-

प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या संदर्भाधीन क्र. २ येथील पत्रातील विनंतीच्या अनुषंगाने शासन पुढीलप्रमाणे आदेश देत आहे :-

१) दिनांक ०४ जुलै, २०२० पासून महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील अनु.क्र.५ येथे नमूद केलेली कार्यालये/ कर्मचारी वगळता अन्य सर्व कार्यालयांसाठी पाच दिवसांचा आठवडा लागू करण्यात येत आहे. त्यामुळे दिनांक ०४ जुलै, २०२० पासून पुढे सर्व शनिवार व रविवार हे सुट्टीचे दिवस असतील.

२) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील सर्व कार्यालयातील कामकाजांची वेळ ४५ मिनिटांनी वाढविण्यात येत असून, ती सोमवार ते शुक्रवार सकाळी ०९.४५ ते सायंकाळी ०६.१५ अशी राहील.

३) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या कार्यालयातील शिपायांसाठी कामकाजाची वेळ सोमवार ते शुक्रवार सकाळी ०९.३० ते सायंकाळी ०६.३० अशी राहील.

४) उपरोक्त कार्यालयीन वेळेमध्ये दुपारी ०१.०० ते ०२.०० या वेळेमधील जास्तीत जास्त अर्ध्या तासाची भोजनाची सुट्टी अंतर्भुत असेल.

५) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील ज्या सेवा अत्यावश्यक म्हणून समजल्या जातात अशा पाणी पुरवठा केंद्रावरील नियमित आस्थापना, रूपांतरीत स्थायी/अस्थायी आस्थापना, कार्यव्ययी आस्थापना, रोजंदारी वरील आस्थापना, सफाई कामगार इ. यांना पाच दिवसांच्या आठवड्याचे आदेश लागू राहणार नाहीत.

६) सदर शासन परिपत्रक दिनांक ०४ जुलै, २०२० पासून अंमलात येईल.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२००६२९१६४००७३७२८ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chetan Balasaheb Nikam

Digitally signed by Chetan Balasaheb Nikam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=MAHARASHTRA, 2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, serialNumber=7268de40660971f80951c66d0e657e903b378196f51a978d2a366cf5eb564c0c, cn=Chetan Balasaheb Nikam
Date: 2020.06.29 16:56:48 +05'30'

**(चेतन निकम)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा. विरोधी पक्ष नेता, विधान सभा/विधान परिषद, विधान मंडळ, मुंबई ४०० ०३२.
७. सर्व मा. संसद सदस्य/विधानसभा सदस्य/विधान परिषद सदस्य, महाराष्ट्र राज्य.
८. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
९. आयुक्त, राज्य निवडणूक आयोग, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई.
१०. महाधिवक्ता, महाराष्ट्र राज्य, मा. उच्च न्यायालय, मुंबई.
११. प्रधान महालेखापल (लेखा व अनुज्ञेयता)-१, मुंबई, महाराष्ट्र.
१२. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपूर, महाराष्ट्र.
१३. प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, मुंबई, महाराष्ट्र.
१४. प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, नागपूर, महाराष्ट्र.
१५. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. प्रधान सचिव, विधान मंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई.
१७. महाप्रबंधक, मा. उच्च न्यायालय, मुंबई.
१८. प्रबंधक, लोकायुक्त व उपलोकायुक्त यांचे कार्यालय, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई.
१९. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
२०. मुख्य माहिती आयुक्त, राज्य माहिती आयोग, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई.
२१. राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२२. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.

२३. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२४. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
२५. सर्व विभागीय आयुक्त.
२६. सर्व जिल्हाधिकारी.
२७. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
२८. सर्व महानगर पालिकांचे आयुक्त.
२९. सर्व पोलिस आयुक्त/सर्व पोलिस आधीक्षक.
३०. सर्व नगरपालिका/नगर परिषदांचे मुख्याधिकारी.
३१. सर्व मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख/प्रादेशिक प्रमुख/ कार्यालय प्रमुख.
३२. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई (प्रसिध्दीकरिता).
३३. पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील सर्व सहसचिव/उपसचिव, अवर सचिव व सर्व कार्यासने.
३४. निवड नस्ती (कार्यासन पापु-२३).